**राज्यातील खाजगी अंशत: व पुर्णत: अनुदानित, स्थानिक स्वराज्य संस्थेतील व अध्यापक विद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे माहे ऑगस्ट, २०१८ ते मार्च, २०१९ पर्यंतचे वेतन ऑफलाईन पध्दतीने वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वेतन १२१८/प्र.क्र.२८/१८/टीएनटी-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ ऑगस्ट, २०१८

वाचा :- १) शासनाचा समक्रमांकीत दिनांक २ फेब्रुवारी, २०१८ रोजीचा शासन निर्णय
२) शासनाचे समक्रमांक दिनांक २३.२.२०१८ व २७.२.२०१८ रोजीचे शासन निर्णय
३) शासनाचा समक्रमांक दिनांक १८.५.२०१८ रोजीचा शासन निर्णय

**प्रस्तावना :-**

शालार्थ प्रणालीच्या डाटा बेस सॉफ्टवेअरमध्ये दिनांक १२.०१.२०१८ पासून तांत्रिक दोष निर्माण झाला असून सदरची प्रणाली अद्यापही सुरु झालेली नाही. त्यामुळे शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यास वरील संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. शालार्थ प्रणाली अद्यापही सुरु न झाल्यामुळे या कर्मचाऱ्यांना ऑगस्ट, २०१८ ते मार्च, २०१९ या कालावधीचे वेतन देखील ऑफलाईन पध्दतीने अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील खाजगी अंशत: व पुर्णत: अनुदानित, स्थानिक स्वराज्य संस्थेतील व अध्यापक विद्यालयातील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना शालार्थ क्रमांक मिळालेला आहे तसेच शालार्थ क्रमांक मिळविण्यासाठी पात्र आहेत अशा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना मार्च, २०१९ पर्यंतचे नियमित व थकीत वेतन ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. मा. लोक आयुक्त प्रकरणे, न्यायालयीन प्रकरणे तसेच शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या थकीत वेतनाबाबतचे मान्यतेचे प्रशासकीय आदेश शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्यमिक), आयुक्त (शिक्षण) अथवा शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडून एप्रिल, २०१८ ते मार्च, २०१९ या कालावधीत निर्गमित झालेले असतील अशा प्रकरणात थकीत वेतन ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. अर्धवेळ, रजा कालावधीत नियुक्त तसेच तासिका तत्वावरील शिक्षकांचे नियमित व थकीत वेतन ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. दिनांक १ जुलै, २०१६ व २ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयान्वये अनुदानासाठी पात्र घोषित केलेल्या एकूण ८९७० शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे, दिनांक १३.३.२०१८ च्या शासन निर्णयानुसार वैयक्तिक मान्यता दिलेल्या २७६ शिक्षकांचे व उच्च माध्यमिक शाळांमधील पुरवणी मागणीद्वारे मान्य केलेल्या १७१ शिक्षकांचे वेतन वितरीत केल्यानंतर ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच ज्या थकीत देयकास शासनाच्या मान्यतेची आवश्यकता आहे, अशी देयके शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात यावीत.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६७६/व्यय-५, दिनांक १३.८.२०१८ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे. सदर अनौपचारिक संदर्भान्वये शालार्थ प्रणाली पूर्ववत होईपर्यंत शासन स्तरावरुन मुदतवाढीचा निर्णय घेण्यास मान्यता देण्यात आली आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२११५२२०३४८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila Devendra Chaudhari
Date: 2018.08.21 15:24:43 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल मुंबई
२) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल, ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर
७) महालेखापाल, ( लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी
९) आयुक्त ( शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) शिक्षण संचालक ( प्राथमिक ) , महाराष्ट्र राज्य, पुणे
११) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) संचालक, विद्यापरिषद, पुणे
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१५) सर्व शिक्षणाधिकारी / शिक्षण निरीक्षक ( माध्यमिक / प्राथमिक )
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७) सर्व अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (प्राथमिक/माध्यमिक)
१८) वित्त विभाग ( व्यय-५ ), मंत्रालय, मुंबई
१९) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अर्थसंकल्प कार्यासन / संगणक शाखा, मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती-टिएनटी-३.